**पिण्याच्या पाण्याच्या टंचाई अंतर्गत पालघर जिल्हयातील जव्हार व पालघर तालुक्यातील १९ नळ पाणी पुरवठा योजनांच्या विशेष दुरुस्ती प्रस्तावास "विशेष बाब" म्हणून मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०२४/प्र.क्र. ४८ (भाग-१) /पापु १४**
जी. टी. रुग्णालय इमारत संकुल, ७ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २२ मे, २०२४

**वाचा -**

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग. क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु १४, दिनांक ३.२.१९९९
२) शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र.२०/पापु १४, दिनांक १४.०२.२०१८
३) जिल्हाधिकारी, पालघर यांचे पत्र क्रमांक सामान्य प्रशासन/क्र./कक्ष १/टे-३/कावि-६०/२०२४, दिनांक २३.०४.२०२४
४) भारत निवडणूक आयोग, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक : ४३७/MH-HP/२०२४ (Vigil)/WS-II दिनांक १३.०५.२०२४

**प्रस्तावना-**

दिनांक १४.०२.२०१८ रोजीच्या शासन परिपत्रकातील मुद्दा क्रमांक ०७ येथील तरतुदीनुसार दिनांक ३१ मार्च, नंतर नळ पाणी पुरवठा योजनेच्या दुरुस्तीच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार क्षेत्रीय कार्यालयास नसल्याने, जिल्हाधिकारी, पालघर यांनी सन २०२३-२४ च्या टंचाई कालावधीसाठी पालघर व जव्हार तालुक्यातील काही गावांमध्ये वितरण व्यवस्था नादुरुस्त असल्यामुळे नळ पाणी पुरवठा योजनांची विशेष दुरुस्ती करणे आवश्यक असल्याने टंचाई उपाययोजनेतंर्गत सादर केलेल्या प्रस्तावास लोकसभा निवडणूक आदर्श आचारसंहितेच्या कालावधीत प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती शासनास संदर्भाधीन क्रमांक ०३ येथील पत्रान्वये केली आहे.

राज्यामध्ये सन २०२४ च्या लोकसभा निवडणूकीच्या अनुषंगाने दिनांक १६.०३.२०२४ आदर्श आचारसंहिता घोषित झाल्याने तसेच जव्हार व पालघर तालुक्यातील नळ पाणी पुरवठा योजनांचे क्षेत्र दुष्काळ घोषित क्षेत्रामध्ये येत नसल्याने, विषयाधीन प्रस्तावास भारत निवडणूक

आयोगाची मान्यता मिळणेकरिता प्रस्ताव सादर करण्यात आला होता, त्यास संदर्भाधीन क्रमांक-०४ येथील पत्रान्वये भारत निवडणूक आयोगाने मान्यता दिली आहे.

त्यानुसार पालघर जिल्हयातील जव्हार व पालघर तालुक्यातील नळ पाणी पुरवठा योजनांच्या विशेष दुरुस्तीच्या कामास निवडणूक आयोगाने दिलेली मान्यता विचारात घेता, १९ नळ पाणी पुरवठा योजनांच्या विशेष दुरुस्तीच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन जिल्हाधिकारी, **पालघर** यांनी सादर केलेल्या प्रस्तावांच्या अनुषंगाने या शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या पालघर जिल्हयातील **पालघर व जव्हार** तालुक्यातील **१९** नळ पाणी पुरवठा योजनांच्या विशेष दुरुस्तीच्या कामांना खालील अटींच्या अधीन राहून टंचाई अंतर्गत एक “ विशेष बाब “ म्हणून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) जिल्हाधिकारी, पालघर यांनी पालघर व जव्हार तालुक्यातील नळ पाणी पुरवठा योजनांशी संबंधित गावात पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण झाले असल्याचे सर्व प्रथम घोषित करावे.
२) सदर योजनेच्या कामाचा राजकीय फायदा/लाभ मिळण्याच्या अनुषंगाने आदर्श आचारसंहिता कालावधीमध्ये विपरीत प्रसिध्दी होणार नाही याची जिल्हाधिकारी, पालघर यांनी दक्षता घ्यावी.
३) सदर प्रस्तावात नमूद केलेली सर्व कामे ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पालघर यांचेमार्फत करणे आवश्यक राहील.
४) सदर योजनेची कामे अस्तिवातील नियम विचारात घेऊन विहित पध्दतीने निविदा/ ई-निविदा मागवून करावीत. जादा किंमतीच्या निविदा स्विकृत करण्यात येऊ नयेत.
५) योजनांच्या निविदा अल्प मुदतीची (०७ दिवस ) काढण्यास परवानगी देण्यात येत आहे.
६) निविदा प्रक्रिया दिनांक ३० मे, २०२४ पर्यंत पूर्ण करुन कार्यारंभ आदेश देणे आवश्यक आहे.
७) योजनांची दुरुस्ती कामे दिनांक ३० जून, २०२४ पर्यंत पूर्ण करुन योजनेतून पाणी पुरवठा सुरु होणे आवश्यक आहे.
८) योजनांची कामे मंजूर /मान्यता प्राप्त किंमतीमध्येच तातडीने पूर्ण होतील याची दक्षता घ्यावी. योजनेची किंमत वाढल्यास त्यास शासन जबाबदार राहणार नाही.
९) कोणत्याही कारणाने योजनांच्या खर्चात वाढ झाल्यास त्याकरिता शासनाकडून अनुदान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

१०) सदर योजनांची प्रस्तावात नमूद केलेली कामे जिल्हा परिषद, पालघर मार्फत पूर्ण करण्यात आल्यानंतर योजनांची देखभाल दुरुस्ती व योजनांचे व्यवस्थापन संबंधित ग्रामपंचायत मार्फत करणे आवश्यक राहील.

११) योजनांची कामे मुदतीत पूर्ण होणे आवश्यक असल्याने योजनांच्या निविदा प्रक्रियेपासून ते योजनांतून पाणीपुरवठा सुरु होईपर्यंत आठवडयाच्या प्रत्येक सोमवारी प्रगती अहवाल शासनास पाठविण्यात यावा

**२. याबाबत होणारा खर्च "मागणी क्र. वाय-२, मुख्य लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १९६ जिल्हा परिषद पंचायत / संस्थांना सहाय्य, ०२ जिल्हा परिषदांना अनुदान, (०२)(०३) आकस्मिक पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या तात्पुरत्या उपाययोजनांसाठी जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ए १९५) " या लेखाशीर्षांखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०५२२१११४१८८९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVINKUMAR GULABRAO PAWAR

Digitally signed by PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=5d2dad0f66e8336730e2b666877a365c20f60db099de815eecadde01ca77f148, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8F18625ADB482A7EE2512CEA93CE697388C95A99C89E41E85C05A3DE8476488F, cn=PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
Date: 2024.05.22 12:45:56 +05'30'

**( प्रविणकुमार पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, महसूल ( मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
६. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
७. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
८. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई
९. जिल्हाधिकारी, पालघर
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर

११. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर
१२. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पालघर
१३. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती ( का- पापु-१४)

**शासन निर्णय क्रमांक: टंचाई २०२४/प्र.क्र. ४८(भाग-१)/ पापु -१४ दि. २२ मे, २०२४ च्या सोबतचे**

## परिशिष्ट

| अ.क्र. | तालुका | गावाचे नाव | अंदाजित रक्कम ( रुपये) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | जव्हार | चौक | ५,००,००० |
| २ | जव्हार | डेंगाचीमेट | १०,००,००० |
| ३ | जव्हार | शिरोशी-तळ्याचा पाडा | ३,००,००० |
| ४ | जव्हार | जुनी जव्हार-चोथ्याची वाडी | ५,००,००० |
| ५ | जव्हार | पिंपळशेत-वडपाडा | २०,००,००० |
| ६ | जव्हार | गोरठण-गोरठण गावठाण | १०,००,००० |
| ७ | जव्हार | गोरठण-कुतुरविहिर | १०,००,००० |
| ८ | जव्हार | गोरठण-शिवाजीनगर, खिराडीपाडा | १०,००,००० |
| ९ | जव्हार | गोरठण-भरसटमेट | १०,००,००० |
| १० | पालघर | सफाळे -उंबरपाडा | २०,००,००० |
| ११ | पालघर | नावझे | २०,००,००० |
| १२ | पालघर | केळवा-माहिम | २०,००,००० |
| १३ | पालघर | पंचाळी | १०,००,००० |
| १४ | पालघर | माकूणसार | ५,००,००० |
| १५ | पालघर | एडवण | ५,००,००० |
| १६ | पालघर | दातिवरे | ५,००,००० |
| १७ | पालघर | खार्डी | ५,००,००० |
| १८ | पालघर | कोरे | ५,००,००० |
| १९ | पालघर | मांगेलवाडी | ५,००,००० |

PRAVINKUMAR GULABRAO PAWAR

Digitally signed by PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=5d2dad0f66e8336730e2b666877a365c20f60db099de815eecadde01ca77f148, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8F18625ADB482A7EE2512CEA93CE697388C95A99C89E41E85C05A3DE8476488F, cn=PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
Date: 2024.05.22 12:46:35 +05'30'

**( प्रविणकुमार पवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**